जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग३ (कृषी) संवर्गातील कृषी अधिकारी यांची दि.१/१/२०१७ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची.

# महाराष्ट्र शासन
## ग्रामविकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः जिपअ-२०१८/प्र.क्र.१६/आस्था-४

बांधकाम भवन, २५ मर्झबान मार्ग,मुंबई ४०० ००१.
दिनांक: ०९ऑगस्ट, २०१८

संदर्भ

१) या विभागाचे क्र.जिपअ-२०१७/प्र.क्र.११/आस्था-४, दि.०८.११.२०१७चे पत्र
२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.विकास/कार्या-१/सेवाज्येष्ठता/प्र.क्र.४७/२०१८, दिनांक ३१.०७.२०१८
३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.जिजेसू-२०१८/३७७३/विआशा/कार्या-१९/आस्था-३/जा.क्र.४०४, दि.१९.५.२०१८
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे जा.क्र.२०१७/विशा/जिप/आस्था-१/सीआर ६५/कावी-१८२८, दि.११.०५.२०१८
५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.विकास/ज्येष्ठता सूची/कावि/३७/२०१८, दि.१६.०१.२०१८
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.विकास-आस्थापना/आस्था-२(२)/जितांसेजे/२०७/२०१८, दि.१४.०५.२०१८
७) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.विशा/आस्था/कार्या-११(६)/कावि-१७१४/२०१७, दि.२९.१२.२०१७

## शासन परिपत्रक

शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा वर्ग-३ मधील विविध संवर्गाच्या ज्येष्ठता याद्या विभागीय पातळीवर तयार करुन शासनास पाठविण्याबाबत सर्व विभागीय आयुक्त यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांचेकडून त्यांच्या विभागांतर्गत दि.१.१.२०१७ रोजी नियमित नियुक्त झालेल्या जिल्हा तांत्रिक सेवा वर्ग ३ (कृषि) संवर्गातील जिल्हा परिषदेतील कृषि अधिकारी यांची माहिती संदर्भ क्र.२ ते ७ नुसार शासनास प्राप्त

झाली आहे. त्याआधारे कृषि सेवेसाठी विकल्प दिलेल्याकृषि अधिकाऱ्यांची तात्पुरती ज्येष्ठता सूची तयार करण्यात आली आहे.

सदर दि.२.१.२०१६ ते दि.१.१.२०१७ या कालावधीची तात्पुरती ज्येष्ठता सूची सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावी व त्याबाबत संबंधितांचे काही आक्षेप व हरकती असल्यास त्या कार्यालयीन अभिलेख्यावरुन छाननी करुन आणि आक्षेप योग्य असल्याचे प्रमाणपत्र देवून विभागीय आयुक्त, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या शिफारशींसह खाली दिलेल्या विवरणपत्रात नमूद करुन संबंधित कागदपत्रांसह शासनाकडे पाठविण्यात याव्यात. आक्षेप न तपासताच शासनाकडे पाठविण्यात येवू नयेत. छाननी करुन न पाठविता प्राप्त झालेले तसेच संबंधितांनी परस्पर शासनाकडे पाठविलेले आक्षेप विचारात घेतले जात नाहीत. आक्षेप अर्ज विभागीय आयुक्त तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदमार्फत शासनाकडे पाठविण्याचा शेवटचा दि.०८.०९.२०१८ आहे. सदर दिनांकानंतर पाठविलेले आक्षेप शासन स्तरावर विचारात घेतले जाणार नाहीत, याची नोंद घ्यावी. तसेच दरम्यानच्या कालावधीत सेवानिवृत्त, स्वेच्छा सेवानिवृत्त, राजीनामा अथवा निधन झालेल्या, आंतरजिल्हा बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचीदेखील नावे उचित नोंदीसह कळविण्यात यावीत..

| अ.क्र. | दि.०१/०१/१७ रोजीच्या तात्पुरत्या जेष्ठतासूचीतील अनुक्रमांक | कर्मचाऱ्याचे नांव | जेष्ठतासूचीतील ज्या रकान्यामध्ये दुरुस्ती करावयाची आहे तो रकाना क्रमांक व असलेली सध्याची नोंद | सुचविलेली दुरुस्ती | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

शासनाने यापूर्वी प्रसिद्ध केलेल्या ज्येष्ठता सूचींसंदर्भात असे निदर्शनास आले आहे की, सदर ज्येष्ठता याद्या संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात येत नाहीत. त्यामुळे संबंधितांना त्याबाबतचे आक्षेप वेळीच नोंदविता येत नाहीत. बऱ्याचदा संबंधित कर्मचारी त्यांच्या पदोन्नतीच्या वेळी ज्येष्ठता सूचीत दुरुस्ती करण्याची विनंती करतात. अशा प्राप्त झालेल्या प्रत्येक विनंती अर्जानुसार ज्येष्ठतासूचीत आवश्यक ती दुरुस्ती करण्यासाठी वेळोवेळी शुद्धीपत्रके काढावी लागतात. तसेच यामुळे मानीव दिनांकाची प्रकरणे उद्भवतात. सबब सोबतची ज्येष्ठता यादी सर्व संबंधितांच्या तात्काळ निदर्शनास आणून द्यावी व तसे केल्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास पाठवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०१८०८०९१४३९०५७५२०** असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Ramesh Shinde

Digitally signed by Vivek Ramesh Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=98222e73b61528cee875e0cab75e02437703c365921479fb0198fcf43d79d224, serialNumber=3d2f2d59501068679dd214122d63cb4d2d18b76f5a89cae6eca0162ae6701444, cn=Vivek Ramesh Shinde
Date: 2018.08.10 11:14:47 +05'30'

**(वि.र.शिंदे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, सर्व विभाग,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. सहसंचालक,कृषी आयुक्तालय,पुणे
५. निवड नस्ती

| जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा (वर्ग-३) मधील कृषी अधिकारी यांची यांची दि.१.१.२०१७ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| अ.क्र. | ज्येष्ठता क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | जिल्हा परिषद | जन्म दिनांक | शैक्षणिक पात्रता | नियमित नियुक्तीचा दिनांक | जात प्रवर्ग | शेरा |
| १ | १७१ | श्री.एस.व्ही.भालेराव | औरंगाबाद | ११.०५.१९९० | एम.एस.सी.ॲग्री | ०४.०१.२०१६ | अनु.जाती | |
| २ | १७२ | श्री.एस.आर.गुजलवार | लातूर | २४.०८.१९८० | बी.एस.सी.ॲग्री | ०८.०१.२०१६ | विमाप्र | |
| ३ | १७३ | श्री.पी.बी.गुरुपवार | नांदेड | ०३.०२.१९६३ | कृषि पदविका | ०१.०३.२०१६ | विमाप्र | |
| ४ | १७४ | श्री.के.बी.यादवराव | लातूर | ०१.०१.१९७८ | बी.एस.सी.ॲग्री | २९.१०.२०१६ | अनु.जाती | |
| ५ | १७५ | श्री.व्ही.के.काळुखे | सोलापूर | २८.०५.१९८५ | एम.एस.सी.ॲग्री | १९.११.२०१६ | खुला | |

****************